मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत जिल्हा परिषदेमार्फ़त राबविण्यात येणा-या नळ पाणीपुरवठा योजनांच्या पहिल्या टप्प्याच्या अंमलबजावणी करिता निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०१६/प्र.क्र.८६/पापु-१९**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २९ मार्च, २०१७

वाचा

१) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
२) शासन निर्णय क्रमांक: ग्रापापु-२११५/प्र.क्र.३९/पापु-१९, दिनांक २३ सप्टेंबर, २०१६
३) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१६/प्र.क्र.८३/पापु-१९, दिनांक २५ जानेवारी, २०१७
४) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.३२/पापु-१९, दिनांक २३ मार्च, २०१७
५) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.३३/पापु-१९, दिनांक २३ मार्च, २०१७
६) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.२९/पापु-१९, दिनांक २३ मार्च, २०१७
७) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.३४/पापु-१९, दिनांक २३ मार्च, २०१७
८) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.३५/पापु-१९, दिनांक २२ मार्च, २०१७
९) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.३८/पापु-१९, दिनांक २० मार्च, २०१७
१०) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१६/प्र.क्र.९३/पापु-१९, दिनांक २८ फ़ेब्रुवारी, २०१७
११) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१६/प्र.क्र.८८/पापु-१९, दिनांक ३१ डिसेंबर, २०१६
१२) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.३१/पापु-१९, दिनांक २७ मार्च, २०१७
१३) शासन पत्र क्रमांक: मुपेयो-२०१६/प्र.क्र.७७/पापु-१९, दिनांक २६.१२.२०१६,दि.२८.०२.२०१७, दि.१८.०३.२०१७, दि.२२.०३.२०१७, दि.२९.०३.२०१७
१४) शासन पत्र क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.०६/पापु-१९, दिनांक २३ फ़ेबुवारी, २०१७

**प्रस्तावना:-**

राज्यातील ग्रामीण पाणीपुरवठा क्षेत्रात सुधारणा करण्याच्या उद्देशाने व ग्रामीण जनतेस स्वच्छ आणि पुरेसे पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने संदर्भाधीन क्र.१ येथील दि.०७ मे, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात सन २०१६-१७ ते २०१९-२० या चार वर्षाच्या कालावधीत मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत संदर्भाधीन क्र.४ ते १२ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या व संदर्भाधीन क्र.१३ व १४ येथील शासन पत्रान्वये प्रधान सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांचे अध्यक्षतेखालील तांत्रिक समितीची मान्यता प्रदान करण्यात आलेल्या नळ पाणीपुरवठा योजनांच्या पहिल्या टप्प्याच्या अंमलबजावणीकरिता संबधित जिल्हा परिषदांना अनुदान मंजूर व मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत संदर्भाधीन क्र.४ ते १२ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या व संदर्भाधीन क्र.१३ व १४ येथील शासन पत्रान्वये प्रधान सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांचे अध्यक्षतेखालील तांत्रिक समितीची मान्यता प्रदान करण्यात आलेल्या नळ पाणीपुरवठा योजनांच्या पहिल्या टप्प्याच्या अंमलबजावणीकरिता मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम (लेखाशिर्ष क्र.२२१५ ९९४२) याअंतर्गत संबंधित जिल्हा परिषदांना या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद केल्याप्रमाणे रु.३३५४.०८ लाख (अक्षरी रुपये ३३ कोटी चौपन्न लाख आठ हजार फ़क्त) इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (BDS) खालील अटींच्या अधीन मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

I. संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी हे अनुदान मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत संदर्भाधीन अ.क्र.४ ते १४ येथील शासन निर्णय/पत्रान्वये मान्यता देण्यात आलेल्या नळ पाणीपुरवठा योजनांच्या पहिल्या टप्प्याच्या अंमलबजावणीकरिताच प्राथम्याने खर्च करावे.

II. सदर अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. तसेच अनुदानाची रक्कम ज्याकरिता मंजूर व मुक्त करण्यात आली आहे, त्या प्रयोजनाकरिताच खर्च करावी.

III. मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत निधी मागणी करतांना चालू आर्थिक वर्षात वितरित करण्यात आलेला निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी इत्यादी बाबतची माहिती सादर केल्याशिवाय भविष्यात निधी मंजूर केला जाणार नाही.

IV. ज्या प्रयोजनासाठी निधी वितरित करण्यात आलेला आहे, त्याबाबतची भौतिक प्रगतीची माहिती संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहीत कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दर तीन महिन्यानी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात

नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे विहित प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता नियंत्रक अधिका-याने घ्यावी.

V. या शासन निर्णयातील अटींची तसेच मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची संबंधित अंमलबजावणी यंत्रणाकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करुन घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र- १ /२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना लेखा परिक्षणाकरीता संबधित अंमलबजावणी यंत्रणाची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून संबधित अंमलबजावणी यंत्रणा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

VI. अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकांना संबधित अंमलबजावणी यंत्रणांनी कार्यासन पापु-१९/ पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई / नागपूर व पापु-१९ कार्यासनास सादर करावे.

VII. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ मधील तरतुदीचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच उक्त परिपत्रकान्वये आवश्यक असलेली प्रमाणपत्रे या विभागास सादर करण्यात यावीत.

३. याबाबतचा खर्च “मागणी क्र. वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(२६) मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम (२२१५ ९९४२)- ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखालील तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग , शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या दि.२०.०४.२०१६ च्या परिपत्रकामधील परिच्छेद ७ ते१८ मधील अटी तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ मधील अ.क्र.३ ते ९ येथील बाबींची पूर्तता होत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२९१४५६३३९७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

K. J. Dhalape

Digitally signed by K. J. Dhalape
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3f5563934b9d9717b0481 88d2a6bcc0f11290f50bc27dff39bf3 9cb577fa7a0a, cn=K. J. Dhalape
Date: 2017.03.29 16:22:34 +05'30'

**(का. जा. धलपे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्य मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा (संबंधित).
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
७) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) मुख्य /अधीक्षक अभियंता (ना व ग्रा ), म.जी.प्रा. (संबंधित).
१०) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
११) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद (संबंधित).
१२) निवड नस्ती (पापु-१९)

## विवरणपत्र

| पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांक:मुपेयो-२०१६/प्र.क्र.८६/पापु-१९, दिनांक २९ मार्च, २०१७ चे सहपत्र | | | | |
|---|---|---|---|---|
| मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम लेखाशिर्ष क्र. (२२१५ ९९४२) | | | | |
| अ.क्र. | अंमलबजावणी यंत्रणा | मंजूर योजनांची संख्या | मंजूर योजनांची किंमत (रु.लाख) | वितरीत रक्कम (पहिला टप्पा ३० टक्के) (रु.लाख) |
| १ | जिल्हा परिषद, अमरावती | ०२ | ४१८.३७ | १२५.५१ |
| २ | जिल्हा परिषद, अहमदनगर | ०६ | ३९२.४१ | ११७.७२ |
| ३ | जिल्हा परिषद, औरंगाबाद | ०५ | ४९९.१२ | १४९.७४ |
| ४ | जिल्हा परिषद, कोल्हापूर | ०२ | ३६१.६८ | १०८.५० |
| ५ | जिल्हा परिषद, गडचिरोली | ११ | ७९०.१९ | २३७.०६ |
| ६ | जिल्हा परिषद, गोंदिया | २३ | १४५१.८४ | ४३५.५५ |
| ७ | जिल्हा परिषद, जळगांव | ०२ | १९४.८२ | ५८.४५ |
| ८ | जिल्हा परिषद, जालना | ०५ | ५१२.८० | १५३.८४ |
| ९ | जिल्हा परिषद, ठाणे | ०६ | ४६१.३१ | १३८.३९ |
| १० | जिल्हा परिषद, धुळे | १० | ५९०.२० | १७७.०६ |
| ११ | जिल्हा परिषद, नंदुरबार | ०५ | २८९.५३ | ८६.८६ |
| १२ | जिल्हा परिषद, नांदेड | ०९ | ९२३.५४ | २७७.०६ |
| १३ | जिल्हा परिषद, नागपूर | ०२ | १७१.४७ | ५१.४४ |
| १४ | जिल्हा परिषद, नाशिक | ०९ | ७५४.१४ | २२६.२४ |
| १५ | जिल्हा परिषद, परभणी | ०७ | ४५०.२९ | १३५.०९ |
| १६ | जिल्हा परिषद, बुलडाणा | १२ | १२५८.७८ | ३७७.६३ |
| १७ | जिल्हा परिषद, भंडारा | ०१ | ५६.८३ | १७.०५ |
| १८ | जिल्हा परिषद, रायगड | ०२ | २१७.७१ | ६५.३१ |
| १९ | जिल्हा परिषद, लातूर | ०५ | ३२९.२९ | ९८.७९ |
| २० | जिल्हा परिषद, वाशिम | ०३ | १८५.५१ | ५५.६५ |
| २१ | जिल्हा परिषद, सांगली | ०७ | ७१६.४८ | २१४.९४ |
| २२ | जिल्हा परिषद, सातारा | ०३ | १५३.९५ | ४६.१९ |
| | **एकूण** | **१३७** | **११९८०.२६** | **३३५४.०७** |

K. J. Dhalape

Digitally signed by K. J. Dhalape
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3f5563934b9d9717b048188d2a6bcc0f11290f50bc27dff39bf39cb577fa7a0a, cn=K. J. Dhalape
Date: 2017.03.29 16:23:54 +05'30'

**(का. जा. धलपे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**